राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियानांतर्गत सन २०२५-२६ साठीच्या वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राअपोसुअ-२०२५/प्र.क्र.५७/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ६ मे, २०२५

**संदर्भ:-**

१.कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९/०४/२०१७ .
२. कृषि व पदुम विभागाचा शासन पुरकपत्र क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१२/०९/२०१७ .
३.कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-०९१९/प्र.क्र.२२१/१४-अे, दि.०४/११/२०२०.
४.केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना (Operational guidelines).
५.केंद्र शासनाचे पत्र क्र. ०३/१३/२०२५-KY, दि.३० डिसेंबर, २०२४.
६.शासन पत्र No.CSS-२०२५/C.R.१४/२-A ,दि. २६ मार्च, २०२५.
७.केंद्र शासनाचे पत्र क्र.०३/१३/२०२५-KY, दि.१६ एप्रिल, २०२५.
८.कृषि आयुक्तालयाचे जा.क्र./वि.प्र.१/राअसुपोअ २५-२६/वाकृआ/प्र.क्र.१/प्र.मान्यता/२५/९४८४, दि.२६ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान-अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके करिता सन २०२५-२६ साठीच्या सुधारित मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या असून, **पूर्वीच्या राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान योजनेच्या नावामध्ये "राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान"** असा बदल करण्यात आला आहे. सदर अभियानाच्या कार्यक्षेत्र निवडी अंतर्गत, जिल्हा निवड करणेबाबत निकष नमूद करण्यात आले आहेत. त्यानुसार कमी उत्पादकता व अधिक क्षेत्र क्षमता (Potential Area) असलेले जिल्हे, महत्त्वाकांक्षी (Aspirational) व नक्षलग्रस्त जिल्हे अशा विविध बाबी लक्षात घेवून, जिल्हा निवड करणेबाबत सुधारित मार्गदर्शक सूचनांमध्ये नमूद करण्यात आले आहे. त्यानुसार सन २०२५-२६ साठी पीकनिहाय निवड करण्यात आलेल्या जिल्ह्यांचा तपशील **प्रपत्र १** येथे आहे.

केंद्र शासनाकडील सूचनेनुसार केंद्र पुरस्कृत योजनांचा वार्षिक कृति आराखडा मंजूर नियतव्ययाच्या तुलनेत १२५% मर्यादेत सादर करणेबाबत कळविले होते. त्यानुसार राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान-अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके कार्यक्रमासाठी रु. ३२१८०.१८ लाख (सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्वासह) रकमेचा वार्षिक कृती आराखडा **राज्यस्तरीय मंजुरी समितीला (SLSC)** कृषि आयुक्तालयाच्या नियोजन शाखेमार्फत सादर करण्यात आला होता. सदर वार्षिक कृति आराखड्यास, राज्यस्तरीय मान्यता समितीने (SLSC) दि. २४ मार्च, २०२५ च्या बैठकीत मान्यता प्रदान केली असल्याचे, संदर्भ क्र.६, दि. २६ मार्च, २०२५ च्या इतिवृत्तात नमूद करण्यात आले आहे. तथापि, जिल्ह्यांकडून अंतिम प्रलंबित दायित्व प्राप्त झाल्यानंतर सुधारित प्रलंबित दायित्वाबाबत कळविण्यात येईल, असे SLSC च्या बैठकीत सांगण्यात आले होते. त्यानंतर, केंद्र शासनाने त्यांच्या दि.१६ एप्रिल,२०२५ च्या पत्रान्वये रु.३१९१५.२७ लाख (केंद्र हिस्सा रु.१९१४९.१६० लाख+ राज्य हिस्सा रु.१२७६६.११ लाख ) वार्षिक कृती आराखडा मंजूर केला आहे.

केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सूचनांनुसार, राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अंतर्गत पीक प्रात्यक्षिक (पौष्टिक तृणधान्य उप अभियान, भरडधान्य - मका), एकात्मिक अन्नद्रव्य व कीड व्यवस्थापन (राअसुपोअ-अन्नधान्य पिके), पीक पद्धतीवर आधारित प्रशिक्षण (राअसुपोअ-अन्नधान्य पिके) या घटकांच्या अनुदानाच्या दरामध्ये बदल (वाढ) झाला आहे. त्यामुळे केंद्र शासनाकडून मंजूर वार्षिक कृती आराखड्यामधील आर्थिक लक्षांकाच्या अधीन राहून भौतिक लक्षांक कमी करण्यात आलेले आहेत. सन २०२५-२६ साठीच्या वार्षिक कृती आराखड्यामध्ये केंद्र शासनाने अंतिम मंजुरी देताना राअसुपोअ-कडधान्य योजनेतील फ्लेक्झी घटकांतर्गत प्रस्तावित करण्यात आलेली मास्टर लॅब व बेसिक लॅब या बाबी नामंजूर केल्या आहेत. त्यामुळे सन २०२५-२६ साठीचा **रु.२९६५०.५७ लाख** (प्रलंबित दायित्व वगळून) रकमेचा कार्यक्रम कमी होऊन **रु.२९३८५.६४ लाख** (प्रलंबित दायित्व वगळून) रकमेचा सुधारित कार्यक्रम झाला आहे.

राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान - अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके कार्यक्रमाचे सन २०२४-२५ अंतर्गत अंतरिम प्रगती अहवाल व अंतरिम उपयोगिता प्रमाणपत्र जिल्ह्यांकडून प्राप्त झाल्यानंतर, राज्यस्तरीय मंजुरी समितीने (SLSC) मंजूर केलेले सन २०२४-२५ साठीचे **प्रलंबित दायित्व रु.२५२९.६१** लाखावरून सुधारित प्रलंबित दायित्व **रु. १९९५.०४७** लाख इतके झाले आहे.

राज्य स्तरीय समितीने दिलेली मान्यता, केंद्र शासनाने मंजूर केलेला वार्षिक कृती आराखडा, तसेच, कृषि संचालक (वि. प्र.) यांनी सादर केलेल्या प्रस्ताव या सर्व बाबींचा विचार करुन राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियानाकरिता सन २०२५-२६ साठी **रु.३१३८०.६८५ लाख (केंद्र हिस्सा रु.१८८२८.४११ लाख + राज्य हिस्सा रु.१२५५२.२७४ लाख)** एवढया रकमेच्या वार्षिक कृती आराखडयास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान अंतर्गत अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिकांकरिता सन २०२५-२६ साठी एकूण **रु.३१३८०.६८५ लाख (केंद्र हिस्सा रु.१८८२८.४११ लाख + राज्य हिस्सा रु.१२५५२.२७४ लाख)** (प्रलंबित दायित्वासह) एवढया रकमेच्या वार्षिक कृती आराखडयास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| अ.क्र. | योजना | सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व | | | सन २०२५-२६ साठी प्रस्तावित वार्षिक कृती आराखडा | | | प्रलंबित दायित्वासह प्रस्तावित वार्षिक कृती आराखडा | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | केंद्र | राज्य | एकूण | केंद्र | राज्य | एकूण | केंद्र | राज्य | एकूण |
| १ | भात | ५१.५२४ | ३४.३५० | **८५.८७४** | २९७.००० | १९८.००० | **४९५.०००** | ३४८.५२४ | २३२.३५० | **५८०.८७४** |
| २ | गहू | १९.०५० | १२.७०० | **३१.७५०** | १२६.१४७ | ८४.०९८ | **२१०.२४५** | १४५.१९७ | ९६.७९८ | **२४१.९९५** |
| ३ | कडधान्य | ३९५.४५९ | २६३.६३९ | **६५९.०९८** | ८२२७.३२५ | ५४८४.८८३ | **१३७१२.२०८** | ८६२२.७८४ | ५७४८.५२२ | **१४३७१.३०६** |
| ४ | भरडधान्य (मका) | ५.७७८ | ३.८५२ | **९.६३०** | ७१८.१५५ | ४७८.७७० | **११९६.९२५** | ७२३.९३३ | ४८२.६२२ | **१२०६.५५५** |
| ५ | पौष्टिक तृणधान्य उप अभियान (श्री अन्न) | ६२४.८६४ | ४१६.५७६ | **१०४१.४४०** | ७३८०.००० | ४९२०.००० | **१२३००.०००** | ८००४.८६४ | ५३३६.५७६ | **१३३४१.४४०** |
| ६ | TRFA कडधान्य | ४८.२६० | ३२.१७४ | **८०.४३४** | ३००.००० | २००.००० | **५००.०००** | ३४८.२६० | २३२.१७४ | **५८०.४३४** |
| **एकूण अन्नधान्य** | | **११४४.९३६** | **७६३.२९०** | १९०८.२२६ | **१७०४८.६२७** | **११३६५.७५१** | २८४१४.३७८ | **१८१९३.५६२** | **१२१२९.०४२** | **३०३२२.६०४** |
| ७ | कापूस | १९.१४६ | १२.७६४ | **३१.९१०** | ३७१.६७० | २४७.७८० | **६१९.४५०** | ३९०.८१६ | २६०.५४४ | ६५१.३६० |
| ८ | ऊस | ३२.९४७ | २१.९६४ | **५४.९११** | २११.०८६ | १४०.७२४ | **३५१.८१०** | २४४.०३३ | १६२.६८८ | ४०६.७२१ |
| **एकूण वाणिज्यिक पिके** | | **५२.०९३** | **३४.७२८** | ८६.८२१ | **५८२.७५६** | **३८८.५०४** | ९७१.२६० | **६३४.८४९** | **४२३.२३२** | १०५८.०८१ |
| **एकूण राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान** | | **११९७.०२८** | **७९८.०१९** | १९९५.०४७ | **१७६३१.३८३** | **११७५४.२५५** | २९३८५.६३८ | **१८८२८.४११** | **१२५५२.२७४** | **३१३८०.६८५** |

२.	वरीलप्रमाणे बाब निहाय वार्षिक कृती आराखडा तयार करताना खालील बाबी विचारात घेण्यात आल्या आहेत.

अ) <u>पीक प्रात्यक्षिके</u> :-

१. पीक प्रात्यक्षिके ही बाब शेतकरी गट/शेतकरी उत्पादक कंपनी/शेतकरी उत्पादक सहकारी संस्था यांचेमार्फत राबविण्यात येणार आहे.

२. शेतकरी गट/कंपनी/संस्था दि. ३१ मार्च, २०२४ पूर्वी नोंदणी केलेल्या असाव्यात.

३. शेतकरी गट/कंपनी/संस्था कोणत्याही शासन यंत्रणेकडे नोंदणीकृत असावी. (जसे की, आत्मा, महाराष्ट्र ग्रामीण जीवनोन्नत्ती अभियान (MSRLM), राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नत्ती अभियान (NRLM), महिला आर्थिक विकास महामंडळ, नाबार्ड इ.)

४. पीक प्रात्यक्षिकासाठी MahaDBT पोर्टलद्वारे नोंदणीकृत शेतकरी गट/कंपनी/संस्था निवड **प्रथम अर्ज करणाऱ्यास प्रथम प्राधान्य (FCFS)** या तत्त्वावर करण्यात येईल.

५. गटातील शेतकऱ्यांना पीक प्रात्यक्षिकाचा लाभ देताना Agristack वर नोंदणी बंधनकारक आहे.

६. पीक प्रात्यक्षिकांची अंमलबजावणी गटातील नोंदणीकृत शेतकऱ्यांमार्फत करण्याचे प्रस्तावित असून अनुसूचित जातीसाठी १२ टक्के, अनुसूचित जमातीसाठी ९ टक्के व सर्वसाधारण प्रवर्गासाठी ७९ टक्के या प्रमाणात शेतकऱ्यांची निवड करून यामध्ये वन पट्टाधारक शेतकरी (FRA उपलब्धतेनुसार) तसेच, महिला व दिव्यांग शेतकऱ्यांना प्राधान्य देण्याचे प्रस्तावित असून निवड झालेल्या शेतकरी गट/शेतकरी उत्पादक कंपनी/शेतकरी उत्पादक सहकारी संस्था यांचेकडून हमीपत्र घेण्यात येणार आहे.

आ) <u>प्रमाणित बियाणे उत्पादन</u> :-

१. महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ (महाबीज), राष्ट्रीय बीज निगम (NSC), NAFED, IFFDC, KRIBHCO, HIL, NFL, BBSSL या बियाणे क्षेत्रात काम करणाऱ्या केंद्रिय संस्था, ICAR-संस्था/राज्य कृषि विद्यापीठे (SAUs) यांच्या सीड हब अनुदानास पात्र आहेत.

२. बिजोत्पादनासाठी निवडलेल्या वाणाचे अधिसूचित वर्ष व राज्यासाठी शिफारस असल्याची खात्री करून सुधारित मार्गदर्शक सूचनांमध्ये झालेल्या बदलानुसार **८ वर्षाच्या आतील अधिसूचित वाणांचा** बिजोत्पादन कार्यक्रम राबविण्यात येईल.

३. उपरोक्त बिजोत्पादन संस्थांनी बियाणे उत्पादन कार्यक्रमाची नोंदणी बीज प्रमाणीकरण यंत्रणेकडे करावी. या यंत्रणेच्या सल्ल्याने व मार्गदर्शनाखाली सदर कार्यक्रम राबविण्यात येईल.

४. बियाणे उत्पादन अंतर्गत, बियाणे उत्पादकास, जास्तीत जास्त ५ हेक्टरपर्यंत अनुदान अदा करावयाचे आहे.

इ) <u>प्रमाणित बियाणे वितरण</u> :-

१. १० वर्षांच्या आतील अधिसूचित वाण प्रमाणित बियाणे वितरण अंतर्गत अनुदानास पात्र ठरतील.

२.महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ (महाबीज), राष्ट्रीय बीज निगम (NSC), NAFED, IFFDC, KRIBHCO, HIL, NFL, BBSSL), SAUs, CAUs, ICAR-संस्था, KVKs इ. बियाणे पुरवठादार यंत्रणेकडून बियाणे खरेदी केल्याची व बियाणे उत्पादक यंत्रणेने कोणत्याही त्रयस्थ संस्थेद्वारे पुरवले जाणारे बियाणे खरेदी केले नसल्याची खात्री करणेबाबत सूचना देण्यात येतील.

३.प्रमाणित बियाणे वितरण या घटकांतर्गत आर्थिक सहाय्य प्रति शेतकरी कमाल १ हेक्टरपर्यंत मर्यादित आहे.

४.शेतकऱ्यास संबंधित बियाणे पुरवठादार संस्थेच्या वितरकामार्फत ७/१२ उताऱ्याच्या आधारे प्रथम येणाऱ्यास प्रथम प्राधान्य (FCFS) तत्त्वावर प्रमाणित बियाणे वितरण करण्यात येईल.

५.लाभार्थी शेतकऱ्यांची फार्मर आय डी व आधार क्रमांकासह यादी संबंधित वितरकाने कृषी विभागास सादर करणेबाबत सूचना देण्यात येतील.

ई) **एकात्मिक अन्नद्रव्य व कीड व्यवस्थापन :-**

१.केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सूचनांनुसार एकात्मिक अन्नद्रव्य व कीड व्यवस्थापन या **घटकासाठी अन्नधान्य पिके अंतर्गत अनुदानाचा दर हा रु. २५०० / हे**. किंवा किंमतीच्या ५० टक्के यापैकी निम्नतम दर .

२.ज्या योजनांमध्ये शेतीशाळा या घटकाचा समावेश आहे, अशा योजनांच्या शेतीशाळांमध्ये सहभागी होणारे शेतकरी (Guest Farmers) यांची प्राधान्याने निवड करावी व ज्या योजनांमध्ये शेतीशाळा या घटकाचा समावेश नाही, अशा योजनांमध्ये आवश्यकतेनुसार शेतकरी लाभार्थ्यांची निवड करण्यात येईल.

**उ) स्थानिक पुढाकाराच्या बाबी :-**

१.राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान कापूस अंतर्गत, **बायोचार** ही बाब नव्याने प्रस्तावित करण्यात आलेली आहे. सदर बाबीचा अनुदान दर रु. १००००/- प्रति युनिट किंवा खर्चाच्या ५० टक्के यापैकी निम्नतम दर.

२.राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान ऊस अंतर्गत, **सुपरकेन नर्सरी** ही बाब नव्याने प्रस्तावित करण्यात आलेली आहे. सदर बाबीचा अनुदान दर १ हेक्टर ऊस लागवडीकरिता आवश्यक रोपांच्या सुपरकेन नर्सरीसाठी रु. १००००/- किंवा खर्चाच्या ५० टक्के यापैकी निम्नतम दर.

**ऊ) प्रकल्प व्यवस्थापन चमूसह प्रशासकीय खर्च :-** केंद्र शासनाच्या दि. १६/०४/२०२५ च्या पत्रात सूचित केल्याप्रमाणे राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान (अन्नधान्य व वाणिज्यिक पिके) कार्यक्रमाच्या एकूण मंजूर तरतुदीच्या **२.५% म्हणजेच रु. ७४४.२०८ लाख,** निधी प्रकल्प व्यवस्थापन चमूसह प्रशासकीय खर्च या घटकासाठी असेल. प्रकल्प संनियंत्रण कक्ष (Project Monitoring Unit) व प्रकल्प व्यवस्थापन चमू (project management team) यांना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना आणि सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यता असल्याच्या अधीन राहून खर्च अनुज्ञेय राहील.

३. केंद्र शासनाच्या सुधारित मार्गदर्शक सूचनांनुसार अनुसूचित जाती आणि अनुसूचित जमातीसाठी, एकूण तरतुदीच्या अनुक्रमे १६% आणि ८% प्रमाणात लाभ द्यावयाचा आहे. तथापि, राज्यामध्ये अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या शेतकऱ्यांना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात लाभ देण्याची मुभा राहील, असे नमूद केले आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्य जनगणना, सन २०११ अन्वये **अनुसूचित जातीच्या लोकसंख्येचे प्रमाण ११.८३ % असल्याने त्यासाठी १२% व अनुसूचित जमातीच्या लोकसंख्येचे प्रमाण ९.३४% असल्याने त्यासाठी ९% टक्के व सर्वसाधारण प्रवर्गासाठी ७९% या प्रमाणानुसार प्रवर्गनिहाय, लेखाशीर्षनिहाय** आवश्यक तरतूद खालीलप्रमाणे आहे:-

(रु. लाख)

| अ.क्र. | प्रवर्ग | केंद्र/राज्य | लेखाशीर्ष | सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व | सन २०२५-२६ प्रस्तावित कार्यक्रम | एकूण एकंदर |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | सर्वसाधारण | केंद्र | २४०१ ४६१४ | १०९५.३१२ | १३९२८.७९२ | १५०२४.१०४ |
| | | राज्य | २४०१ A२३४ | ७३०.२०८ | ९२८५.८६२ | १००१६.०७० |
| **एकूण सर्वसाधारण** | | | | **१८२५.५२०** | **२३२१४.६५४** | **२५०४०.१७४** |
| २ | अनुसूचित जाती | केंद्र | २४०१ B१०५ | ५३.७२१ | २११५.७६६ | २१६९.४८७ |
| | | राज्य | २४०१ B११४ | ३५.८१४ | १४१०.५११ | १४४६.३२५ |
| **एकूण अनुसूचित जाती** | | | | **८९.५३५** | **३५२६.२७७** | **३६१५.८१२** |
| ३ | अनुसूचित जमाती | केंद्र | २४०१ A५५७ | ४७.९९५ | १५८६.८२४ | १६३४.८२० |
| | | राज्य | २४०१ A५६६ | ३१.९९७ | १०५७.८८३ | १०८९.८८० |
| **एकूण अनुसूचित जमाती** | | | | **७९.९९२** | **२६४४.७०७** | **२७२४.६९९** |
| **एकूण** | | केंद्र | -- | **११९७.०२८** | **१७६३१.३८३** | **१८८२८.४११** |
| | | राज्य | -- | **७९८.०१९** | **११७५४.२५५** | **१२५५२.२७४** |
| **एकूण एकंदर** | | | | **१९९५.०४७** | **२९३८५.६३८** | **३१३८०.६८५** |

३.	सदर वार्षिक कृती आराखडयामधील पिकनिहाय, तसेच, घटक / उपघटक निहाय मंजूर आर्थिक व भौतिक लक्षांकाचे विवरण सोबतच्या **प्रपत्र-२ ते ९** मध्ये नमूद केले आहे. सदर अभियानाची केंद्र व राज्याच्या ६०:४० आर्थिक सहभागाच्या प्रमाणात अंमलबजावणी करण्यात यावी.

४.	सदर योजनेच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य हिस्स्याचा निधी प्रवर्गनिहाय ६०:४० प्रमाणात वेळोवेळी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. सदर निधी केंद्र व राज्य हिश्श्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ करिता करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा -

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **सर्वसाधारण** | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्य पिके<br>(००) (२५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ ४६१४) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्य पिके<br>(००) (३३) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(राज्य हिस्सा ४०%) (२४०१ A२३४) (योजनांतर्गत) (दत्तमत) ३३, अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जाती** | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००) (०५) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(केंद्र हिस्सा ६०%) अनुसूचित जाती उपयोजना (२४०१ B१०५),<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक एन-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचीत जाती उपयोजना<br>(००) (०६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(राज्य हिस्सा ४०%) अनुसूचित जाती उपयोजना (२४०१ B११४),<br>३३, अर्थसहाय्य |
| **अनुसूचित जमाती** | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),<br>जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,<br>(०१) (२१) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(केंद्र हिस्सा ६०%) (२४०१ A५५७)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक टी-५<br>२४०१- पीक संवर्धन,<br>७९६-जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (पंचवार्षिक योजनांतर्गत योजना),<br>जनजाती क्षेत्राअंतर्गत उपयोजना,<br>(०१) (२२) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(राज्य हिस्सा ४०%) (२४०१ A५६६)<br>३३, अर्थसहाय्य |

५.	केंद्र शासनाने सदर अभियानातंर्गत विहित केल्याप्रमाणे अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, तसेच, महिला शेतकरी लाभार्थ्यांना सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात यावा.

६.	केंद्रीय कृषी मंत्रालयाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियानांतर्गत अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिकांकरिता, राज्य शासनास सन २०२५-२६ करिता, संदर्भाकिंत १६ एप्रिल,२०२५ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार, तसेच, चालू वर्षी अभियानाकरिता मंजूर केलेल्या कृती आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रीय मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील, याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे सनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाची प्रभावी अंमलबजावणी व सनियंत्रणाकरिता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निर्देशित करावे.

७. राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियानांतर्गत अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिकांकरिता विविध घटकांतर्गत लाभार्थी शेतकरी निवडतेवेळी अल्प व अत्यल्प भूधारक शेतकऱ्यांना वा सदर शेतकऱ्यांच्या गटांना प्राधान्य देण्यात यावे. तसेच, शेतकऱ्यांचे अर्ज मागवून पारदर्शक पद्धतीने लाभार्थ्यांची निवड करावी.

८. या अभियानांतर्गत विविध निविष्ठांच्या खरेदीसाठी (खते, औषधे, बियाणे, सिंचन साधने इ.) शासनाच्या प्रचलित धोरणानुसार थेट लाभार्थ्यांच्या बँक खाती अनुदान जमा करण्यात (Direct Benefit Transfer) यावे. सदर निविष्ठांची खुल्या बाजारातून खरेदी करण्याचे स्वातंत्र्य लाभार्थ्याला राहील. तथापि, या अभियानातंर्गत शासकीय संस्थांनी/ शासनाच्या सार्वजनिक उपक्रमांनी उत्पादित केलेल्या निविष्ठांचा पुरवठा करण्यात येत असल्यास, संदर्भांकीत शासन निर्णय दि.१९/०४/२०१७ व दि.१२/०९/२०१७ नुसार कार्यवाही करावी.

९. कृषि विभागाच्या योजनांची महा-डीबीटी पोर्टलद्वारे अंमलबजावणी करण्याबाबत संदर्भांकीत शासन परिपत्रक दि.०४/११/२०२० नुसार कृषि यांत्रिकीकरण, सिंचन साधने व सुविधा, प्रमाणित बियाणे वितरण व पीक प्रात्यक्षिके याबाबींची अंमलबजावणी करावी.

१०. सदर लाभार्थांच्या यादीनुसार, सर्व लाभार्थी शेतक-यांच्या शेतावर, हाती घेण्यात आलेल्या कार्यक्रमाची प्रत्यक्ष तपासणी त्या-त्या गावातील कृषि सहाय्यकांनी करावयाची असून, त्यांनी आपला अहवाल तालुका कृषि अधिका-यांमार्फत, जिल्हा अधीक्षक कृषि अधिका-यांना सादर करावयाचा आहे. त्याचप्रमाणे, कृषि सहाय्यकांचे अहवाल प्राप्त होताच, सदर कार्यक्रमांतर्गत राबविण्यात आलेल्या कामांच्या पर्यवेक्षीय तपासणीचे उचित प्रमाण संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी मार्गदर्शक सूचनेमध्ये विहित करावे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५०६१७४७५०८००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DA026E85AE8CB84E3C2ACDBECB8F2F6D6CB0AE6ED5C1E54483490119E E0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2025.05.06 17:49:41 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.सभापती, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
१२) संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१३) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१४) सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१५) महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा), मुंबई.

१६)	महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७)	महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१८)	सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१९)	सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
२०)	वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२१)	निवड नस्ती.

**शासन निर्णय क्रमांक : राअपोसुअ-२०२५/प्र.क्र.५७/४-अे**

**प्रपत्र-१**

राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान-अन्नधान्य पिके व वाणिज्यिक पिके अंतर्गत सन २०२५-२६ साठी पीकनिहाय निवड करण्यात आलेल्या जिल्ह्यांचा सविस्तर तपशील

| अ.क्र | योजना | सन २०२५-२६ साठी प्रस्तावित जिल्हे | |
|---|---|---|---|
| | | संख्या | जिल्ह्यांची नावे |
| १ | भात | ९ | नाशिक, नंदुरबार, पुणे, सातारा, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली |
| २ | गहु | ०५ | सोलापूर, बीड, नांदेड, परभणी व नागपूर |
| ३ | कडधान्य | ३२ | ठाणे, पालघर, रायगड, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगाव, अहिल्यानगर, पुणे, सोलापूर, सातारा, सांगली, कोल्हापूर, छ. संभाजीनगर, बीड, जालना, लातूर, धाराशिव, नांदेड, परभणी, हिंगोली, बुलडाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ, वर्धा, नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली |
| ४ | भरडधान्य (मका) | १२ | धुळे, नंदुरबार, अहिल्यानगर, सोलापूर, सांगली, सातारा, छ. संभाजीनगर, जालना, बीड, धाराशिव, बुलढाणा व गोंदिया |
| ५ | पौष्टिक तृणधान्य उप अभियान (श्री अन्न) | २६ | ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगाव, अहिल्यानगर, पुणे, सोलापूर, सातारा, सांगली, कोल्हापूर, छ. संभाजीनगर, बीड, जालना, लातूर, धाराशिव, नांदेड, परभणी, हिंगोली, बुलडाणा, वाशिम, अमरावती |
| ६ | भात पड क्षेत्रावर कडधान्य उत्पादन वाढविणे कार्यक्रम (TRFA कडधान्य ) | १७ | ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग, नाशिक, नंदुरबार, अहिल्यानगर, पुणे, सातारा, सांगली, कोल्हापूर, नागपुर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली |
| ७ | कापूस | १३ | धुळे, नंदुरबार, जळगाव, अहिल्यानगर, छ. संभाजीनगर, जालना, बीड, नांदेड, बुलढाणा, अकोला, अमरावती, यवतमाळ व वर्धा |
| ८ | ऊस | ८ | नंदुरबार, अहिल्यानगर, सोलापूर, कोल्हापूर, बीड, जालना, लातूर व धाराशिव |

## प्रपत्र-२

## राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान - भात सन २०२५-२६ साठी मंजूर कृती आराखडा

(रु. लाखात)

| अ.क्र | तपशील | अनुदानाचा दर | परिमाण | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| १ | **सुधारित तंत्रज्ञानावर आधारित प्रात्यक्षिके** | | | | |
| | अ) श्री पद्धत | रू. ९००० प्रति हे. | हे. | ७०० | ६३.००० |
| | ब) ओळीत पुनर्लागवड | रू. ९००० प्रति हे. | हे. | ५०० | ४५.००० |
| | क) यांत्रिकी पद्धतीने भात लागवड | रू. ९००० प्रति हे. | हे. | ५०० | ४५.००० |
| | ड) पीक पद्धतीवर आधारित पीक प्रात्यक्षिके (भात पिकानंतर कडधान्य-हरभरा/चवळी/राजमा/वाल) | रू. १५००० प्रति हे. | हे. | ४८० | ७२.००० |
| | **एकूण पीक प्रात्यक्षिके १ (अ) ते १ (ड)** | | | **२१८०** | **२२५.०००** |
| २ | **प्रमाणित बियाणे वितरण** | | | | |
| | अ) अधिक उत्पादन देणारे वाण (१० वर्षाच्या आतील) | रू. २००० प्रति क्विं. किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | क्वि. | ५००० | १००.००० |
| | ब) अधिक उत्पादन देणारे वाण (१० वर्षाच्या वरील) | रू. १००० प्रति क्विं. किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | क्वि. | २५०० | २५.००० |
| | **एकूण २ (अ) ते २ (ब)** | | | **७५००** | **१२५.०००** |
| ३ | **अ) एकात्मिक अन्नद्रव्य व्यवस्थापन** | | | | |
| | i) सूक्ष्म मूलद्रव्ये | रू. २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | १२०० | ३०.००० |
| | **ब) एकात्मिक कीड व्यवस्थापन** | | | | |
| | i) पीक संरक्षण औषधे | रू. २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | ९०४ | २२.६०० |
| | ii) तणनाशके | | हे. | ९०० | २२.५०० |
| | **एकूण ३ (अ) ते ३ (ब)** | | | **३००४** | **७५.१००** |
| ४ | **फ्लेक्झी घटक** | | | | |
| | **अ) पीक पद्धतीवर आधारित प्रशिक्षण** | रू. ३०००० प्रति | संख्या | **२३३** | **६९.९००** |
| | **एकूण ४ (अ)** | | | | **६९.९००** |
| | **I) एकूण राअसुपोअ -भात** | | | | **४९५.०००** |
| | **II) सन २०२४-२५चे प्रलंबित दायित्व** | | | | ८५.८७४ |
| | **एकूण एकंदर ( I + II )** | | | | **५८०.८७४** |
| | | | केंद्र हिस्सा (६०%) | | ३४८.५२४ |
| | | | राज्य हिस्सा (४०%) | | २३२.३५० |

***टीप***-*धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल.*

## प्रपत्र-३

### राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान - गहू सन २०२५-२६ मंजुर कृती आराखडा

| अ.क्र. | तपशील | अनुदानाचा दर | परिमाण | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| १ | सुधारित तंत्रज्ञानावर आधारित प्रात्यक्षिके | | | | |
| | अ) सलग क्षेत्रावरील गट प्रात्यक्षिके | रु. ९००० प्रति हे. | हे. | ५०० | ४५.००० |
| | ब) पाण्याचा ताण सहन करणाऱ्या/ बायोफोर्टीफाईड वाण | रु. ९००० प्रति हे. | हे. | २३३ | २०.९७० |
| | क) पीक पद्धतीवर आधारित पीक प्रात्यक्षिके - | | | | |
| | सोयाबीन\मुग\उडीद नंतर गहू | रु. १५००० प्रति हे. | हे. | १९० | २८.५०० |
| | **एकूण पीक प्रात्यक्षिके १ (अ) ते १ (क)** | | | **९२३** | **९४.४७०** |
| २ | **प्रमाणित बियाणे वितरण** | | | | |
| | अ) अधिक उत्पादन देणारे वाण (१० वर्षाच्या आतील) | रु. २००० प्रति क्विं. किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | क्विं. | २१०० | ४२.००० |
| | ब) अधिक उत्पादन देणारे वाण (१० वर्षाच्या वरील) | रु. १००० प्रति क्विं. किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | क्विं. | १०५० | १०.५०० |
| | **एकूण २ (अ) व २ (ब)** | | | **३१५०** | **५२.५००** |
| ३ | **अ) एकात्मिक अन्नद्रव्य व्यवस्थापन** | | | | |
| | सूक्ष्म मूलद्रव्ये | रु. २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | ४८० | १२.००० |
| | **ब) एकात्मिक कीड व्यवस्थापन** | | | | |
| | i) पीक संरक्षण औषधे व जैविक घटक | रु. २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | ४०७ | १०.१७५ |
| | ii) तणनाशके | | हे. | ३८४ | ९.६०० |
| | **एकूण ३ (अ) व ३ (ब)** | | | **१२७१** | **३१.७७५** |
| ४ | **फ्लेक्झी घटक** | | | | |
| | **अ) पीक पद्धतीवर आधारित प्रशिक्षण** | रु. ३०००० प्रति | संख्या | १०५ | ३१.५०० |
| | **एकूण ४ (अ)** | | | | **३१.५००** |
| | **एकूण राअसुपोअ - गहू** | | | | **२१०.२४५** |
| | **II) सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व** | | | | ३१.७५० |
| | **एकूण एकंदर ( I + II )** | | | | **२४१.९९५** |
| | **केंद्र हिस्सा (६०%)** | | | | **१४५.१९७** |
| | **राज्य हिस्सा (४०%)** | | | | **९६.७८९** |

टीप-धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल

## प्रपत्र-४

### राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान - कडधान्य सन २०२५-२६ साठी मंजूर कृती आराखडा

| अ.क्र. | तपशील | अनुदानाचा दर | परिमाण | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| १ | **सुधारित तंत्रज्ञानावर आधारित प्रात्यक्षिके** | | | | |
| | **अ) सलग गट प्रात्यक्षिके** | | | | |
| | १) तूर | ₹ ९००० प्रति हे. | हे. | ८००० | ७२०.००० |
| | २) मुग | | हे. | ६००० | ५४०.००० |
| | ३) उडीद | | हे. | ५५०० | ४९५.००० |
| | ४) हरभरा | | हे. | १३००० | ११७०.००० |
| | **एकूण गट प्रात्यक्षिके** | | **हे.** | **३२५००** | **२९२५.०००** |
| | **ब) आंतरपीक प्रात्यक्षिके** | | | | |
| | सोयाबीन + तूर | ₹ ९००० प्रति हे. | हे. | १७००० | १५३०.००० |
| | **क) पीक पद्धतीवर आधारित प्रात्यक्षिके** | | | | |
| | १) मुग नंतर रबी ज्वारी | ₹ १५००० प्रति हे. | हे. | १६०० | २४०.००० |
| | २) मुग नंतर गहू | | हे. | ९०० | १३५.००० |
| | ३) उडीद पिकानंतर रबी ज्वारी | | हे. | १६०० | २४०.००० |
| | ४) उडीद पिकानंतर गहू | | हे. | १६०० | २४०.००० |
| | ५) भात नंतर हरभरा | | हे. | २३०० | ३४५.००० |
| | ६) बाजरी नंतर हरभरा | | हे. | १९०० | २८५.००० |
| | **एकूण पीक पद्धतीवर आधारित प्रात्यक्षिके** | | हे. | **९९००** | **१४८५.०००** |
| | **एकूण पीक प्रात्यक्षिके १ अ) ते १ क)** | | **हे.** | **५९४००** | **५९४०.०००** |
| २ | **अधिक उत्पादन देणाऱ्या वाणाचे बियाणे उत्पादन व वितरण** | | | | |
| | **अ) प्रमाणित बियाणे वितरण (१० वर्षाच्या आतील)** | | | | |
| | १) तूर | रु. ५००० प्रति क्विं. किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | क्विं. | ७००० | ३५०.००० |
| | २) मुग | | क्विं. | १५०० | ७५.००० |
| | ३)उडीद | | क्विं. | ६००० | ३००.००० |
| | ४) हरभरा | | क्विं. | २२००० | ११००.००० |
| | **एकूण २ अ** | | | **३६५००** | **१८२५.०००** |
| | **ब) प्रमाणित बियाणे वितरण (१० वर्षाच्या वरील)** | | | | |
| | १) तूर | रु. २५०० प्रति क्विं. किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | क्विं. | ५५०० | १३७.५०० |
| | २) मुग | | क्विं. | ७०० | १७.५०० |
| | ३)उडीद | | क्विं. | २००० | ५०.००० |
| | ४) हरभरा | | क्विं. | १०००० | २५०.००० |
| | **एकूण २ ब** | | | **१८२००** | **४५५.०००** |
| | **एकूण २ अ ते २ ब** | | | **५४७००** | **२२८०.०००** |
| | **क) बियाणे उत्पादनास सहाय्य (८ वर्षाच्या आतील)** | | | | |
| | १) तूर | रु. ५००० प्रति क्विं. | क्विं. | १४००० | ७००.००० |
| | २) मुग | | क्विं. | ३००० | १५०.००० |
| | ३) उडीद | | क्विं. | ७००० | ३५०.००० |
| | ४) हरभरा | | क्विं | २३००० | ११५०.००० |
| | **एकूण २ क** | | | **४७०००** | **२३५०.०००** |
| ३ | **अ) एकात्मिक अन्नद्रव्ये व्यवस्थापन** | | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | १) सूक्ष्म मूलद्रव्ये | रु. २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | १३४०० | ३३५.००० |
| | २) जैविक खते | | हे. | १७५२० | ४३८.००० |
| | **एकूण ३ अ** | | | **३०९२०** | **७७३.०००** |
| | **ब) एकात्मिक कीड व्यवस्थापन** | | | | |
| | १) पिक संरक्षण औषधे | रु.२५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | ४६००० | ११५०.००० |
| | २) तणनाशके | | हे. | ४९९६ | १२४.९०० |
| | **एकूण ३ ब** | | | **५०९९६** | **१२७४.९००** |
| | **एकूण ३ अ ते ब** | | | **८१९१६** | **२०४७.९००** |
| ४ | **फ्लेक्झी घटक** | | | | |
| | अ) पीक पद्धतीवर आधारित प्रशिक्षण | रु.३०००० प्रति | संख्या | ११६७ | **३५०.१००** |
| | ब) प्रकल्प व्यवस्थापन चमू सह प्रशासकीय खर्च | एकूण NFSNM तरतुदीच्या २.५ % | -- | | ७४४.२०८ |
| | **एकूण ४ (अ) ते ४ (ब)** | | | | **१०९४.३०८** |
| | **I) एकूण राअसुपोअ -कडधान्य** | | | | **१३७१२.२०८** |
| | **II) सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व** | | | | ६५९.०९८ |
| | **एकूण एकंदर ( I + II )** | | | | **१४३७१.३०६** |
| | | | केंद्र हिस्सा (६०%) | | ८६२२.७८४ |
| | | | राज्य हिस्सा (४०%) | | ५७४८.५२२ |

**टीप-**धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल.

## प्रपत्र-५

### राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान - भरडधान्य (मका) सन २०२५-२६ साठी मंजूर कृती आराखडा

| अ. क्र. | तपशील | अनुदानाचा दर | परिमाण | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| | पीक प्रात्यक्षिके : मका | | | | |
| | अ) सुधारित तंत्रज्ञान आधारित पीक प्रात्यक्षिके | रुपये. ७५०० प्रती हेक्टर | हेक्टर | ६३२० | ४७४.००० |
| | ब)आंतरपिकप्रात्यक्षिके (मका+सोयाबीन / मका+तूर)) | रुपये. ७५०० प्रती हेक्टर | हेक्टर | ९२० | ६९.००० |
| | एकूण १ (अ) ते १ (ब) | | | ७२४० | ५४३.००० |
| | प्रमाणित बियाणे वितरण | | | | |
| | अ) संकरीत बियाणे - मका | किमतीच्या ५०% किंवा रु. १००००/ क्विंटल मर्यादेत | क्विंटल | २९५७ | २९५.७०० |
| | एकूण २ (अ) | | | २९५७ | २९५.७०० |
| | अ) एकात्मिक अन्नद्रव्य व्यवस्थापन | | | | |
| | १) सूक्ष्म मूलद्रव्ये | ₹ २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | १११८ | २७.९५० |
| | २) जैविक खते | | हे. | ९४७ | २३.६७५ |
| | एकूण ३ अ | | | २०६५ | ५१.६२५ |
| | ब) एकात्मिक कीड व्यवस्थापन | | | | |
| | १) तणनाशके | ₹ २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हे. | २००० | ५०.००० |
| | २) पीक संरक्षण औषधे | | हे. | ३१०० | ७७.५०० |
| | एकूण ३ ब | | | ५१०० | १२७.५०० |
| | एकूण ३ अ ते ब | | | ७१६५ | १७९.१२५ |
| | फ्लेक्झी घटक | | | | |
| | शेतकरी प्रशिक्षण | ₹ ३०००० प्रति | संख्या | ५९७ | १७९.१०० |
| | एकूण ४ | | | ५९७ | १७९.१०० |
| I) एकूण राअसुपोअ -भरडधान्य (मका) | | | | | ११९६.९२५ |
| II) सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व | | | | | ९.६३० |
| एकूण एकंदर ( I + II ) | | | | | १२०६.५५५ |
| केंद्र हिस्सा (६० टक्के ) | | | | | ७२३.९३३ |
| राज्य हिस्सा (४० टक्के ) | | | | | ४८२.६२२ |

टीप-धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल.

# प्रपत्र-६

## राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान – पौष्टिक तृणधान्य उप-अभियान (श्री अन्न)

## सन २०२५-२६ साठी मंजूर कृती आराखडा

| अ. क्र. | तपशील | अनुदानाचा दर | परिमाण | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| १ | सुधारित तंत्रज्ञानावर आधारित पिक प्रात्यक्षिके | | | | |
| | (१) ज्वारी (खरीप) | रुपये ७५००/हेक्टर | हेक्टर | १४०० | १०५.००० |
| | (२) ज्वारी (रब्बी) | | | ५१६८० | ३८७६.००० |
| | (३) बाजरी | | | १४८०० | १११०.००० |
| | (४) नाचणी | | | ५२०० | ३९०.००० |
| | (५) वरई | | | ७२० | ५४.००० |
| | एकुण पीक प्रात्यक्षिके | | | **७३८००** | **५५३५.०००** |
| २ | प्रमाणित बियाणे वितरण | | | | |
| | अ) सुधारित बियाणे (१० वर्षा आतील अधिसूचित वाण ) | | | | |
| | (१) बाजरी | किंमतीच्या ५० % किंवा रु.३०००प्रती क्विं.मर्यादेत | क्विंटल | १२३०० | ३६९.००० |
| | (२) नाचणी | | | २५०० | ७५.००० |
| | (३) रब्बी ज्वारी | | | ३४४०० | १०३२.००० |
| | एकुण २ अ) | | | **४९२००** | **१४७६.०००** |
| | ब) सुधारित बियाणे (१० वर्षावरील अधिसूचित वाण ) | | | | |
| | (१) रब्बी ज्वारी | रुपये १५०० प्रति क्विंटल | क्विंटल | २४६०० | ३६९.००० |
| | एकूण २ अ) ते क) | | | **२४६००** | **३६९.०००** |
| | एकूण बियाणे वितरण | | | **७३८००** | **१८४५.०००** |
| ३ | प्रमाणित बियाणे उत्पादन | | | | |
| | (राज्यासाठी शिफारशीत असलेले ८ वर्षाआतील अधिसूचित वाण) | | | | |
| | (१) ज्वारी | रुपये ३००० प्रति क्विंटल | क्विंटल | ५७४०० | १७२२.००० |
| | (२) बाजरी | | | १६४०० | ४९२.००० |
| | (३) नाचणी | | | ७४०० | २२२.००० |
| | (४) वरई | | | ८०० | २४.००० |
| | एकूण बियाणे उत्पादन | | | **८२०००** | **२४६०.०००** |
| ४ | एकात्मिक अन्नद्रव्य व्यवस्थापन (INM) | | | | |
| | (१) सूक्ष्म मूलद्रव्ये | ₹ २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हेक्टर | ३६९० | ९२.२५० |
| | (२) जैविक खते | | | ३६९० | ९२.२५० |
| | एकूण INM | | | **७३८०** | **१८४.५००** |
| | एकात्मिक कीड व्यवस्थापन (IPM) | | | | |
| | (१) तणनाशके | ₹ २५०० प्रति हे. किंवा किमतीच्या ५० टक्के जे कमी असेल ते | हेक्टर | १९९२६ | ४९८.१५० |
| | (२)पीक संरक्षण औषधे | | | ४६४९४ | ११६२.३५० |
| एकूण IPM | | | | **६६४२०** | **१६६०.५००** |
| | एकूण एकात्मिक अन्नद्रव्य व कीड व्यवस्थापन ( INM & IPM) | | | **७३८००** | **१८४५.०००** |
| ५ | फ्लेक्झी घटक | | | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | अ) शेतकरी प्रशिक्षण | ₹ ३०००० प्रति | संख्या | १२७० | ३८१.००० |
| | ब) जनजागृती / प्रचार प्रसिद्धी | | | | |
| | जिल्हास्तरीय महोत्सव | रुपये ६.०० लाख /जिल्हा | संख्या | ३९ | २३४.००० |
| | एकूण ५ अ ते ५ ब | | | | **६१५.०००** |
| I) एकूण राअसुपोअ - पौष्टिक तृणधान्य उप-अभियान (श्री अन्न) | | | | | **१२३००.०००** |
| II) सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व | | | | | १०४१.४४० |
| एकूण एकंदर ( I + II ) | | | | | **१३३४१.४४०** |
| **केंद्र हिस्सा (६० टक्के)** | | | | | ८००४.८६४ |
| **राज्य हिस्सा (४० टक्के)** | | | | | **५३३६.५७६** |

टीप-धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल.

## प्रपत्र-७

### राअसुपोअ - भात पड क्षेत्रामध्ये कडधान्याचे उत्पादन वाढविण्यासाठी (TRFA कडधान्य) कार्यक्रम सन २०२५-२६साठी मंजूर कृती आराखडा

| अ.क्र. | तपशील | अनुदानाचा दर | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|
| | | | भौतिक | आर्थिक |
| १ | सुधारीत तंत्रज्ञानावर आधारित पीक प्रात्यक्षिके | | | |
| | अ) हरभरा | रु. ९००० प्रती हे. | २५०० | २२५.००० |
| | **एकूण (१)** | | **२५००** | **२२५.०००** |
| २ | निविष्ठा वितरण - | | | |
| | अ) प्रमाणित बियाणे वितरण | | | |
| | **i) हरभरा** (१० वर्षाच्या आतील वाण) | रु. ५००० प्रती क्विंटल किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | १६०० | ८०.००० |
| | **ii) हरभरा**(१० वर्षाच्या वरील वाण) | रु. २५०० प्रती क्विंटल किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | ८०० | २०.००० |
| | **एकूण २ (अ)** | | **२४००** | **१००.०००** |
| | **ब) पीक संरक्षण औषधे** | रु. २५०० प्रती हे. किंवा किमतीच्या ५०% जे कमी असेल ते | ४०१२ | १००.३०० |
| | **एकूण २ अ) ते २ ब)** | | | **२००.३००** |
| ३ | **पीक पद्धतीवर आधारीत प्रशिक्षण** | रु. ३०००० प्रती | २४९ | ७४.७०० |
| **I) एकूण राअसुपोअ -TRFA कडधान्य** | | | | **५००.०००** |
| **II) सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व** | | | | ८०.४३४ |
| **एकूण एकंदर ( I + II )** | | | | **५८०.४३४** |
| **केंद्र हिस्सा (६०%)** | | | | **३४८.२६०** |
| **राज्य हिस्सा (४०%)** | | | | **२३२.१७४** |

**टीप**-धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल.

# प्रपत्र-८

## राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान - कापूस सन २०२५-२६ साठी मंजूर कृती आराखडा

| अ. क्र | तपशील | अनुदानाचा दर | परिमाण | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| १ | आद्यरेषिय प्रात्यक्षिके (देशी व अति लांब धाग्याच्या कापूस बिजोत्पादन) | रु.९०००/- प्रति हेक्टर | हेक्टर | ३० | २.७०० |
| २ | आद्यरेषिय प्रात्यक्षिके (कापूस पिकात आंतरपिके - मुग, उडीद) | रु.८०००/- प्रति हेक्टर | हेक्टर | ४०० | ३२.००० |
| ३ | कापसाच्या सरळ वाणांची अतीघन लागवड पध्दतीची प्रात्यक्षिके | रु.१००००/-प्रति हेक्टर | हेक्टर | ३०० | ३०.००० |
| ४ | एकात्मिक पीक व्यवस्थापन (आयसीएम) प्रात्यक्षिके | रु. ८०००/- प्रति हेक्टर | हेक्टर | ३००० | २४०.००० |
| ५ | पिक संरक्षण औषधे व बायो एजंटस चे वितरण | प्रत्यक्ष खर्चाच्या ५० टक्के कमाल रु.५००/- प्रति हेक्टर | हेक्टर | ३२७१० | १६३.५५० |
| ६ | राज्यस्तरीय अधिकारी -कर्मचारी प्रशिक्षण | रू.४००००/- प्रति प्रशिक्षण | संख्या | ३ | १.२०० |
| ७ | ऑनलाईन पेस्ट मॉनिटरिंग ॲण्ड ॲडव्हायझरी सर्व्हिसेस (ओपीएमएएस) | - | -- | -- | ५०.००० |
| ८ | **स्थानिक पुढाकाराच्या बाबी -** | | | | |
| | अ) कापूस पिकाचे फरदड निर्मूलन प्रात्यक्षिके | रु.५०००/- प्रति हेक्टर | हेक्टर | १८०० | ९०.००० |
| | ब) बायोचार | रु. १००००/-प्रति युनिट | संख्या | १०० | १०.००० |
| | **एकूण ८ (अ + ब)** | | | | **१००.०००** |
| **I) एकूण राअसुपोअ -कापूस** | | | | | **६१९.४५०** |
| **II) सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व** | | | | | ३१.९१० |
| **III) एकूण एकंदर (I + II)** | | | | | **६५१.३६०** |
| **केंद्र हिस्सा** | | | | | **३९०.८१६** |
| **राज्य हिस्सा** | | | | | **२६०.५४** |

**टीप**-धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल.

## प्रपत्र-९

राष्ट्रीय अन्न सुरक्षा आणि पोषण अभियान - ऊस सन २०२५-२६ मंजूर कृती आराखडा

| अ. क्र | तपशील | अनुदानाचा दर | परिमाण | मंजूर लक्षांक | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | भौतिक | आर्थिक |
| १ | एक डोळा पट्टा पध्दतीचा अवलंब व आंतरपीक प्रात्यक्षिके (हेक्टर) | रु.९०००/- प्रति हेक्टर | हेक्टर | ३००० | २७०.००० |
| २ | मुलभूत बियाणे उत्पादनासाठी अर्थसहाय्य (कृषि विद्यापीठ प्रक्षेत्र) | रु.४००००/ हे. | हेक्टर | १० | ४.००० |
| ३ | उती संवर्धित रोपे (प्रति रोप) | रु. ३.५०/- प्रति रोप | लाख संख्या | ३.०० (लाख) | १०.५०० |
| ४ | राज्यस्तरीय प्रशिक्षण | रु.४००००/- प्रति प्रशिक्षण | संख्या | ४ | १.६०० |
| ५ | पीक संरक्षण औषधे बायोएजंट्सचे वितरण | प्रत्यक्ष खर्चाच्या ५० टक्के कमाल रु.५००/- प्रति हेक्टर | हेक्टर | ७१४२ | ३५.७१० |
| ६ | **स्थानिक पुढाकाराच्या बाबी -** | | | | |
| | अ) पाचट व खोडवा व्यवस्थापन प्रात्यक्षिके | रु.६०००/- प्रति हेक्टर | हेक्टर | ३५० | २१.००० |
| | ब) सुपरकेन नर्सरी | एका रोपवाटिकेसाठी रु. १००००/- (क्षमता- १ हेक्टर रोपांचे उत्पादन, जास्तीत जास्त २ हेक्टर पर्यंत) | हेक्टर | ९० | ९.००० |
| | | | **एकूण ६ (अ + ब)** | | ३०.००० |
| **I) एकूण राअसुपोअ-ऊस** | | | | | **३५१.८१०** |
| **II) सन २०२४-२५ चे प्रलंबित दायित्व** | | | | | ५४.९११ |
| **III) एकूण एकंदर (I + II)** | | | | | **४०६.७२१** |
| **केंद्र हिस्सा** | | | | | **२४४.०३३** |
| **राज्य हिस्सा** | | | | | **१६२.६८८** |

**टीप-धरती आबा जनजातीय ग्राम उत्कर्ष अभियान (DAJGUA) अंतर्गत लाभार्थींचा सदर योजनेत समावेश करण्यात येईल.**